महाराष्ट्र शासन

क्रमांक : संकीर्ण-२००९/प्र.क्र.१३३ /जल-१३
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
मंत्रालय मुंबई ३२
दिनांक :- २२ जुलै, २००९.

संदर्भ: शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२००४/ प्र.क्र २५/०४ /१२, दिनांक २५ मे २००६.

कार्यालयीन आदेश

संदर्भाधीन शासन अधिसूचनेव्दारा महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ प्रस्तृत करण्यात आला आहे. सदर अधिनियमाच्या कलम ९(३) मधील तरतूदी प्रमाणे प्रत्येक विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी विभागाशी कार्यालयाशी संबंधित सर्व बाबीवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टिने प्रकरणे सादर करणा-या अधिका-यांचे तीन स्तर निर्धारित करुन प्रसिध्द करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने या कार्यासनाशी संबधित विषयांच्या बाबतीत सोबतच्या तक्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरीष्ठ अधिका-याचे निर्देश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २००९०७२२१६३२४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( विजय पाटील )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
प्रधान सचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक ,
सचिव (ग्राम विकास व पंचायती राज) यांचे स्वीय सहाय्यक,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व पर्यवेक्षकीय अधिकारी,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने
कार्यासन अधिकारी (आस्था-१, रोखशाखा), ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
निवडनस्ती /जल-१३

G:Ast cr 133.09 Dt 13.07.2009. Declaration lwp.lwp

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील कलम ९ (१), (२) व (३) अंतर्गत कार्यासनाशी संबधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टिने प्रकरणे सादर करणा-या अधिका-यांचे तीन स्तर निर्धारित करणे.

| अ.क्र | विषय | स्तर | | | आदेश / प्रमाणपत्र / पत्र निर्गमित करण्यास सक्षम अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | व्दितीय | तृतीय | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मा.लोकआयुक्त व मा.उप लोक आयुक्त यांचेकडून उपलब्ध होणारे प्रकरण. | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | उप सचिव |
| २ | सामाजिक वनीकरण विभागातील कर्मचाऱ्यांचे गोपनिय अहवाल, जन्मतारीख, इत्यादी सेवा विषयक बाबी. | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | उप सचिव |
| ३ | सामान्य प्रशासन विभागाकडून प्राप्त होणारे मा. मुख्यमंत्री, मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, खासदार, आमदार इत्यादी मान्यवरांचा पत्रव्यवहार (विकाक संदर्भ) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | उप सचिव |
| ४ | अनुकंपा तत्वावरील नेमणूकाबाबत | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी |
| ५ | सामाजिक वनीकरण विभागातील कर्मचाऱ्यांची कर्तव्ये व जबाबदारी (मुख्यालयी राहण्याबाबत सह ) संबंधीत सर्व बाबी. | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी |
| ६ | सामाजिक वनीकरण विभागातील अधिकारी /कर्मचारी यांच्याशी निगडीत/मागण्या/तक्रारी/ भ्रष्टाचार बाबतचा पत्रव्यवहार | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ७ | सामाजिक वनीकरण विभागातील कर्मचाऱ्यांच्या जन्मतारखे संबंधीची प्रकरणे | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी |
| ८ | सामाजिक वनीकरण विभागातील कर्मचाऱ्यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीबाबींचे (रु४०,०००/- पेक्षा जास्त) प्रस्ताव हाताळणे | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव / कार्यासन अधिकारी |
| ९ | सामाजिक वनीकरण विभागातील सर्व साधारण बाबी. | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी |
| १० | कार्यासनांकडे सोपविलेल्या संकीर्ण बाबी वर कार्यवाही करणे. | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी |
| ११ | सामाजिक वनीकरणातील प्रशिक्षणांबाबत संबंधीत आस्थापनाविषयक बाबी. | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी |
| १२ | सामाजिक वनीकरण विभाग यांच्याशी संबंधीत असणारे विधान सभा / विधान परिषद प्रश्न व इतर सर्व बाबी | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी | उपसचिव | प्रधान सचिव (जलसंधारण) | अवर सचिव/ कार्यासन अधिकारी |